**स्थलांतरित होणाऱ्या व शाळेत अनियमित राहणा-या मुलांना शाळेत नियमित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र. ओएससी-४४१६/(३०६/१६)/एसडी-४**
**मादाम कामा मार्ग ,हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय ,मुंबई ४०००३२.**
**दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०१६**

वाचा :-सर्व शिक्षा अभियान परिपत्रक दिनांक ०१/१०/२०१५

**शासन परिपत्रक :**

मागील शैक्षणिक वर्षात शैक्षणिक गुणवत्ता वाढवण्यासाठी प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र या कार्यक्रमाच्या माध्यमातून मोठ्या प्रमाणात काम झाले आहे. त्या कामाची गती दिवसेंदिवस वाढत आहे. आता प्रत्येकाला असा विश्वास वाटत आहे की, राज्यातील १००% शाळा प्रगत होऊ शकतील. पुढच्या वर्षापर्यंत १००% शाळा प्रगत करावयाचे उद्दिष्ट देखील आहे. यावर्षी काही जिल्हयांचा आढावा घेतला असता आताच काही जिल्ह्यातील ५०% पेक्षा अधिक शाळा त्या जिल्हयांमध्ये प्रगत झाल्या असल्याचे निदर्शनास आले आहे.

प्रत्येक ठिकाणी शाळेच्या वर्गातील एक-दोन मुले शैक्षणिक प्रगतीमध्ये मागे राहत असल्याचे सांगितले जात आहे. अशा मुलांच्या शैक्षणिक प्रगतीकरिता शाळेतील शिक्षक व संपूर्ण यंत्रणा कामाला लागली असून पुढे त्यात यश नक्कीच मिळणार आहे.

परंतू, खालील तीन प्रकारची मुले या प्रवाहातून सुटून जाण्याची भिती आहे. जवळ जवळ संपूर्ण यंत्रणेला हे जाणवले आहे कि, या सध्याच्या व्यवस्थेत खाली नमूद मुलांचे शिक्षण हे अशक्य आहे.

१. स्थलांतरित होणा-या कुटुंबासह अन्य ठिकाणी जाणारी मुले (राज्यांतर्गत स्थलांतर).
२. इतर राज्यांतून स्थलांतरित होवून येणा-या कुटुंबांसह येणारी मुले.
३. शाळेच्याच परिसरात वास्तव्यास असून सुध्दा तसेच शिक्षकांच्या सर्व प्रयत्नांती देखील शाळेत नियमित न राहणारी मुले.

या तीनही प्रकारच्या मुलांना शिक्षणाच्या प्रवाहात नियमित ठेवण्यासाठी शासन आता खालीलप्रमाणे निर्देश देत आहे.

**१. राज्यातंर्गत स्थलांतरित होणारी मुले :-**

१.१ उपरोल्लिखित परिपत्रकात नमूद केल्याप्रमाणे राज्यात रोजगाराच्या निमित्ताने कुटुंब स्थलांतरित होत असली तरी मुले शिक्षणापासून वंचित होऊ नये यासाठी सर्वांनी कटाक्षाने लक्ष द्यावे. स्थलांतरित होणाऱ्या कुटुंबातील शिक्षण घेत असलेल्या वयातील मुलांना त्यांच्या पालकांनी त्याच कुटुंबातील परंतु स्थलांतरित न होणा-या वयस्क मंडळींसोबत उदा. आजोबा, आजी इ. सोबत राहण्यास प्रवृत्त करावे. ही व्यवस्था न होऊ शकल्यास गावातील इतर कुटुंबे ज्यांच्यांवर संबंधित कुटुंबास विश्वास आहे त्यांच्या घरी मुलांची व्यवस्था करावी. या दोन्ही गोष्टी शक्य न

झाल्यास हंगामी वस्तीगृह उघडण्यात यावे. इतरांच्या घरी थांबविलेली मुले व वस्तीगृहात राहणा-या मुलांसाठी जेवणाची व नाष्टयाची व्यवस्था वरील परिपत्रकाप्रमाणे करावी. तथापि, या सर्व मुलांची नियमित हजेरी घेण्यासाठी ॲप आधारित व्यवस्था सरल प्रणालीमध्ये करण्यात यावी. त्याचा डॅशबोर्ड तयार करुन त्याचा जिल्हानिहाय अहवाल दरदिवशी एसएमएस च्या स्वरुपात शिक्षण आयुक्त व प्रधान सचिव, शालेय शिक्षण यांना प्राप्त होईल याची व्यवस्था करावी.

१.२ काही मुलांना थांबविण्यास अपयश आल्यास त्या मुलांसाठी शैक्षणिक हमीपत्र (Education Guarantee Card) तयार करुन त्या कुटूंबाला देण्यात यावे. तसेच, ती मुले राज्यांतर्गत स्थलांतरित होत असल्यास आणि स्थलांतरित होणा-या गावाची माहिती असल्यास त्या गावातील शाळेच्या मुख्याध्यापकाचे दुरध्वनी क्रमांक संबंधित पालकांकडून मिळवून त्या मुख्याध्यापकांस शैक्षणिक हमीपत्र what॰s app द्वारे सुध्दा पाठविण्यात यावे. ही मुले त्या गावात पोहचल्यावर त्या गावाच्या शाळेत दाखल झाल्याची शहानिशा मूळ गावाच्या शाळेतील मुख्याध्यापकांनी करावी. अशा रितीने तालुक्याची माहिती घेण्यात यावी आणि सरल प्रणालीमध्ये माहिती भरुन मुलाचे शैक्षणिक हमीपत्र तेथे अपलोड करावे.

ज्या जिल्हयामध्ये आणि तालुक्यांमध्ये मुले स्थलांतरित होवून येतात. त्या जिल्हयातील आणि तालुक्यातील शिक्षणाधिकारी व गटशिक्षणाधिकारी यांना सरल संगणक प्रणालीच्या वापराद्वारे e-mail ने या मुलांसंदर्भातील माहिती द्यावी. तसेच, तालुक्यातील आणि जिल्हयातील स्थलांतरित होऊन आलेल्या मुलांच्या संख्येची माहिती SMS द्वारे दररोज शिक्षणाधिकारी व गटशिक्षणाधिकारी यांना देण्यात यावी. SMS आणि e-mail द्वारे माहिती मिळाल्यावर त्या मुलांना शाळेत दाखल करण्याची जबाबदारी शिक्षणाधिकारी व गटशिक्षणाधिकारी यांची राहील. मुलांना शाळेत दाखल केल्यावर त्याबाबतची माहिती सरल प्रणालीमध्ये अपलोड करावी.

ही सर्व प्रक्रिया पूर्ण झाल्यावर राज्यांतर्गत स्थलांतरीत होणारे एकसुध्दा मूल स्थलांतरित ठिकाणच्या शाळेत दाखल होईलच याची काळजी घेणे आवश्यक राहील. तथापि, ही सर्व प्रक्रिया काटेकोरपणे राबविली जात आहे याचे संनियंत्रण ठेवण्याच्या द्दष्टिने दर आठवडयाला खालील तक्त्यात अहवाल शासनाला पाठविण्यात यावा. हा अहवाल फार मोठा होणार असल्यामुळे कोणत्याही जिल्हयात १०० पेक्षा कमी मुले स्थलांतरित होत असल्यास त्याचा अहवाल शासनास देण्यात येवू नये. तथापि, ज्या जिल्हयातून ती मुले स्थलांतरित झाली असतील त्या जिल्हयाच्या शिक्षणाधिका-याला प्रत्येक मुलाचा हिशोब लागेल एवढा विस्तृत अहवाल देण्यात यावा. या अहवालाचा आढावा दर आठवडयाला संबंधितांनी घ्यावा. प्रधान सचिवांनी व्हिडिओ कॉन्फरसिंगद्वारे अहवाल घ्यावा.

**राज्यातंर्गत स्थलांतरित होणा-या मुलांचा अहवाल**

| मूळ जिल्हयाचे नाव | स्थलांतरित होणा-या जिल्हयाचे नाव | मुलांची संख्या | पैकी शाळेत दाखल झालेल्या मुलांची संख्या | अद्याप दाखल व्हावयाच्या मुलांची संख्या |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

## २. इतर राज्यांतून स्थलांतरित होऊन येणारी मुले :-

राज्यातील काही भागांमध्ये इतर राज्यातील मुले व पालक रोजगारांसाठी येतात. विशेष करुन मोठया शहरातील बांधकामाच्या ठिकाणी बाहेरील राज्यातील कामगार अधिक प्रमाणात असतात. काही काही वेळा हे कामगार २-३ वर्षे त्याच ठिकाणी राहतात. या कामगारांची मुले इतर राज्यांमधून आली असल्यामुळे त्यांची मातृभाषा मराठी नसते, तरीसुध्दा या मुलांना मराठी शाळांमध्ये दाखला देण्यात यावा. बहुभाषी शिक्षणाबाबत विद्याप्राधिकरणाने दिलेल्या पुस्तकांमधील दिशा निर्देशांचे उपयोग करुन या मुलांना शिक्षण द्यावे. तथापि, एकाच ठिकाणी अशा मुलांची संख्या २० पेक्षा अधिक असल्यास त्या मुलांसाठी संबंधित भाषेचे जाणकार शिक्षक इतर ठिकाणाहून बदलीने आणण्यात यावेत. ते शक्य नसल्यास CSR किंवा लोक सहभागातून त्या भाषेचा जाणकार व्यक्तीस शिक्षणमित्र म्हणून काम सोपवावे.

## ३. शाळेच्या परिसरात राहूनसुध्दा अनियमित राहणारी मुले -

शासनाच्या मते या मुलांना शाळेत आणण्साठी शिक्षक व अधिकारी सर्वांनी प्रयत्न करुन सुध्दा अपयश आलेले असते. पंरतू, जी मुले शाळेत नियमित नाही झाली म्हणजेच प्रयत्न अपुरा ठरला असेही म्हणता येईल. काही वेळा शाळेतील शिक्षणाची गुणवत्ता योग्य नसल्यामुळे या मुलांना शाळेत येऊन काही फायदा नाही असे वाटल्याने सुध्दा ही मुले शाळेतून दूर फेकली जातात. परंतू, अलिकडच्या काळात राज्यात सर्वदूर शिक्षक आणि अधिकारी गुणवत्तावाढीसाठी जोरात कामाला लागले आहेत. गुणवत्ता वाढीसाठी होत असलेल्या प्रयत्नांमुळे अशी मुले शाळेत आल्यास पुन्हा दूर फेकली जाण्याची शक्यता कमी आहे. परंतू तरीही मुले शाळेत नियमित होत नाहीत असे लक्षात आल्यास या मुलांना शाळेत आणण्यासाठी नाविन्यपूर्ण पध्दत अवलंबवायची गरज आहे. यास अनुसरुन आता खालील निर्देशाप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

३.२ जानेवारी, २०१७ पासून महिन्याच्या दर सोमवारी शाळेच्या पटावर असलेल्या सर्व मुलांच्या १० च्या गटात वर्ग शिक्षक सोबत सेल्फी घेण्यात यावीत.

३.२.१ या सेल्फीमध्ये असलेल्या मुलांची नावे आणि त्यांचे आधारक्रमांकसह या सेल्फीला सरलमध्ये अपलोड करण्यात यावे.

३.२.२ सुरुवातीचे दोन सोमवारनंतर फक्त अनियमित राहणा-या मुलांचे सेल्फी सोबत नाव व आधार क्रमांक अपलोड करावे. असे केल्याने फक्त अनियमित मुलांसाठी काम करणे शक्य होईल व सेल्फी अपलोड करण्याचा वेळ वाचेल.

३.२.३ अशा अपलोड झालेल्या माहितीच्या आधारे सरल प्रणालीचा वापर करुन खालील माहिती देण्यात यावी

३.२.३.१ पटावर नावाच्या तुलनेत हजर विद्यार्थ्यांची जिल्हानिहाय संख्या - सुरुवातीचे दोन आठवडे - प्रत्येक आठवडयाला शासनास सादर करावी.

३.२.३.२ शिक्षणाधिका-यांना तालुकानिहाय गैरहजर विद्यार्थ्यांच्या संख्येची माहिती देण्यात यावी.

३.२.३.३ गटशिक्षणाधिकारी यांना शाळानिहाय गैरहजर असलेल्या विद्यार्थ्यांची नावे देण्यात यावीत.

३.२.३.४ दोन आठवडयानंतर शिक्षकांच्या मते अनियमित विद्यार्थ्यांची संख्या आणि त्यांच्यापैकी गैरहजर विद्यार्थ्यांची संख्या दर आठवडयाला देण्यात यावी. असे केल्याने अनियमित विद्यार्थ्यांना नियमित करण्याचे गूढ शिक्षक व क्षेत्रिय अधिका-यांना कळेल अशी अपेक्षा आहे. अनियमित विद्यार्थ्यांना नियमित करण्याच्या कार्यात शालेय व्यवस्थापन समिती, स्वयंसेवी संस्था, स्थानिक लोक प्रतिनिधी यांची मदत घेण्यात यावी.

आयुक्त, शिक्षण या कार्यालयाने या परित्रकासाठी आवश्यक आज्ञावल्या तयार करण्यासाठी करण्यात आलेल्या नियोजनाची तपशीलवार माहिती शासनास एका आठवडयात द्यावी.

सदर शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१६११०३१३१३४५६६२१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, cn=Nand Kumar
Date: 2016.11.03 13:19:30 +05'30'

**( नंद कुमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
४. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
५. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
७. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, मुंबई
८. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
११. संचालक, महाराष्ट्र राज्य परिक्षा परिषद, पुणे
१२. संचालक, प्रौढ शिक्षण, पुणे

१३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१४. आयुक्त, सर्व महानगरपालिका
१५. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
१६. सर्व विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
१७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१८. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद सर्व.
१९. शिक्षण निरिक्षक मुंबई (पश्चिम, दक्षिण व उत्तर)
२०. प्रशासन अधिकारी, महानगरपालिका सर्व
२१. संचालक, विज्ञान संस्था, नागपूर
२२. संचालक, आंग्लभाषा संस्था, औरंगाबाद
२३. सर्व डायट प्राचार्य
२४. सर्व गटशिक्षणाधिकारी
२५. सर्व प्राथमिक / माध्यमिक शाळांचे मुख्याध्यापक (शिक्षणाधिकारी, प्राथमिक / माध्यमिक यांचे मार्फत)
२६. शालेय शिक्षण विभागातील सर्व सहसचिव, उपसचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी
२७. निवड नस्ती, एसडी-४